**कृषि विद्यापीठे व त्याच्याशी संलग्न असलेल्या अनुदानित महाविद्यालयांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सदस्य असणारा कर्मचारी १० वर्षे सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यू पावल्यास नामनिर्देशित व्यक्तीस/ कायदेशीर वारसास द्यावयाच्या सानुग्रह अनुदान व लाभासाठी लेखाशीर्ष उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२१/प्र.क्र.७२/७ अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १० फेब्रुवारी, २०२२.

संदर्भ:- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर,२०१८.

२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक : मकृप-१०१८/प्र.क्र.२३०/६-अे, दि.२८ फेब्रुवारी, २०२०.

३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.१० फेब्रुवारी, २०२१.

**प्रस्तावनाः**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार कृषि विद्यापीठे व संलग्न असलेल्या अनुदानित महाविद्यालयांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सदस्य असणारा कर्मचारी १० वर्षे सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यू पावल्यास नामनिर्देशित व्यक्तीस/ कायदेशीर वारसास रु.१०.०० लक्ष इतके सानुग्रह अनुदान अधिक कर्मचाऱ्यांच्या खाती जमा असलेली संचित रक्कम देण्याबाबत या विभागाचा शासन निर्णय दि.२८.०२.२०२० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयात लेखाशीर्ष नमूद केलेले नाही. तथापि, संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या दि.१०.०२.२०२१ च्या परिपत्रकान्वये स्वतंत्र लेखाशीर्ष घेण्याबाबत सूचना देण्यात आली आहे. त्यानुसार राज्यातील चार कृषि विद्यापीठे व त्याच्याशी संलग्न असलेल्या अनुदानित महाविद्यालयांसाठी स्वतंत्र लेखाशीर्ष उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

राज्यातील कृषि विभागांतर्गत येणाऱ्या चार कृषि विद्यापीठे व त्याच्याशी संलग्न असलेल्या सर्व मान्यताप्राप्त अनुदानित महाविद्यालयांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत योजनेच्या सदस्य असणारा कर्मचारी १० वर्षे सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यू पावल्यास नामनिर्देशित व्यक्तीस/ कायदेशीर

वारसास रु.१०.०० लक्ष इतके सानुग्रह अनुदान अधिक कर्मचाऱ्यांच्या खाती जमा असलेली संचित रक्कम आरहित करण्यासाठी निम्नलिखित लेखाशीर्ष मंजूर करण्यात येत आहे.

| मागणी क्र.जी-६ | | | Demand No.G-6 | | |
|---|---|---|---|---|---|
| मुख्य लेखाशीर्ष | २०७१ | निवृत्तीवेतने व इतर सेवानिवृत्ती लाभ | Major Head | 2071 | Pension and Other Retirement Benefits |
| उपमुख्य लेखाशीर्ष | ०१ | नागरी | Sub Major Head | 01 | Civil |
| गौण शीर्ष | १०३ | अनुकंपा भत्ते | Minor Head | 103 | Compassionate Allowances |
| गट शीर्ष | (००) | -- | Group Head | (00) | - |
| उपशीर्ष | (००)(१२) | कृषि विद्यापीठे, कृषि विद्यापीठांशी संलग्न असलेली महाविद्यालये संलग्नशास्त्र यांचेकडील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (अनिवार्य) | Sub Group Head | (00)(12) | Defined Contributory/ National Pension Scheme Ex-gratia for Teaching and Non-Teaching Staff of Agricultural Universities, Colleges affiliated to Agricultural Universities (Committed) |
| उद्दिष्ट | ०४ | निवृत्तीवेतन विषयक खर्च | Object | 04 | Pensionary Charges |
| सांकेतांक | | २०७१ ०७९४ | CRC | | 2071 0794 |

२. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३२२/२०२१/व्यय-१, दि.०३.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०२१०१४५९०५४४०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.02.10 15:00:29 +05'30'

**( वर्षा मेहेर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे-१,

३) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
४) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
५) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
६) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
७) उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर / दापोली / अकोला / परभणी,
८) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / अहमदनगर / रत्नागिरी / अकोला / परभणी,
११) उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा - अहमदनगर,
१२) उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा - रत्नागिरी,
१३) उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा - अकोला,
१४) उपकोषागार अधिकारी, परभणी, जिल्हा - परभणी,
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१८) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१९) वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प -१८), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२०) अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.